मला गुलाम करून तीन पाट काढून जीवदान दिलें, असें विराटाच्या दरबारांत जाहीर करण्याला जर तूं, नरपशो, तयार असलास, आणि आमचे अज्ञातवासाचे दिवस संपेतोंपर्यंत आमच्याविषयीं मौन व्रत धरावयास जर कबूल असलास, तर कीचका, रत्नप्रभेकरितां व विराटाकरितां—धर्मराजाच्या आज्ञेनें—तुला जिवंत सोडतों.

**सैरं०**—कीचका, बायकोच्या सद्गुणामुळें तुझा प्राण वांचला ह्याबद्दल वाईट वाटून घेऊं नकोस.—रत्नप्रभेकरितां तुला जीवदान देण्यास माझी ना नाहीं.

**कीच०**—जिवंत राहून द्रौपदीचा गुलाम होण्यापेक्षां युद्ध करून जिवंत राहिलों, तर द्रौपदीला माझ्या रंगमहालांत ठेवीन.

**भीम०**—आपला रंगमहाल आतां गिधाडांच्या वस्तींत.

**कीच०**—खरा क्षत्रीय असशील तर गदायुद्ध—

**भीम०**—गदायुद्ध ? आतां काय म्हणून गदायुद्ध ?—ज्या चिलटाचा चिटकी वाजवून प्राण घ्यावयाचा त्याच्याकरितां कोण गदा आणीत बसतो !—धर्मराज, जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं.—द्रौपदी कीचकवधाशिवाय पांडवांना गत्यंतर नसल्यामुळें मी ह्याला आतां यमसदनास पाठवितों. [ छातींत बुक्की मारतो. कीचक मरून पडतो. ] चल, द्रौपदी, ह्या वनांतून शहरांत जाऊं व धर्मराजाचें दर्शन घेऊन पुढें काय करावयाचें तें ठरवूं.

**सैरं०**—पण प्राणनाथ, आपण येथें केव्हां आलांत, तें अगोदर सांगायचें होतें.

**भीम०**—कीचकवधासंबंधानें धर्मराजाची शेवटची आज्ञा ऐकून मी वनाकडे आलों. वनांत कोणी निशाचरानें चुकून मला पाहिलें तर दैवी चमत्कारानें कीचक मारला गेला असें त्याला वाटावें म्हणून वनाजवळ येतांच मी भैरवाचें सोंग घेतलें.—इतक्यांत रथांत किरीट वगैरे फेकून देऊन सड-

सडीत होऊन जंगलांत घाईघाईनें शिरतांना कीचकाला मीं पाहिलें. तेव्हां जलदीनें पुढें येऊन तूं मूर्छित असतांनाच भैरवाला उचलून आंत ठेवून [ भैरवाची मूर्ति आंतून आणतो ] ह्याच्या जागीं मी उभा राहिलों, व जीवदानास कीचक सत्पात्र आहे किंवा कसें, ह्यासंबंधानें धर्मराजांनीं सांगितल्याप्रमाणें त्याची परीक्षा करण्याकरितां तुम्हां दोघांचा संवाद ऐकत होतों. [ भैरवाची स्थापना करून ] द्रौपदी, ह्या भैरवाला नमस्कार कर. [ दोघेहि नमस्कार करतात. ] हा प्रसाद ललाटाला लाव. [ दोघेहि शेंदूर कपाळाला लावतात. ] चल, द्रौपदी, धर्मराजाला ही सर्व हकीकत कळवूं.

[ जातात. ]



खाडिलकरांची

# आध्यात्मिक ग्रंथमाला

(१) खाडिलकरांचा रुद्र (२) खाडिलकरांचें संध्यावंदन व पुरुषसूक्त (३) खाडिलकरांचें ऐतरेय आणि ईशावास्योपनिषद् (४) खाडिलकरांचें तैत्तिरीयोपनिषद् (५) खाडिलकरांची ॐकाराची उपासना. (६) खाडिलकरांचा याज्ञवल्क्य-मैत्रेयी संवाद व त्रिसुपर्णाची शिकवणूक.

कै. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यांनीं वैदिक वाङ्मयाचें सतत भक्तिपूर्वक मननचिंतन करून वरील ग्रंथ तयार केलेले आहेत. या सहाहि ग्रंथांत मूळ मंत्र सार्थ व सटीप दिलेले आहेत. वैदिक शिकवण दररोजच्या संसारापासून ब्रह्मप्राप्तीपर्यंत सर्वत्र उपयुक्त कशी आहे याबद्दलचा अभिनव प्रकाश पाडणारीं त्या त्या ग्रंथावरील विस्तृत व तेजस्वी विवेचनें प्रत्येक पुस्तकांत दिलेलीं आहेत. त्यामुळें नित्य पाठांतरासाठीं व अध्ययन-मननासाठीं हे ग्रंथ अत्यंत संग्राह्य असे झाले आहेत. किंमत प्रत्येकीं १ रुपया.

ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें:—नवाकाळ ऑफिस, मुंबई नं. ४ चित्रशाळा प्रेस, पुणें; दुकान, मुंबई; दत्त एजन्सी, बुधवार पेठ, पुणें